# प्रस्तावना



इंग्रजी काव्याच्या अफाट भांडारांत कितीतरी सूक्ति आहेत. अशा शेकडों लहानमोठया सूक्ति निवडून श्री ल. गो. विंझे यांनीं त्यांचा पद्यमय अनुवाद मराठींत केला. 'प्रसाद' मासिकाचे संपादक आणि प्रख्यात साहित्यिक श्री. य. गो. जोशी यांनीं या सूक्ति, मूळ इंग्रजींत व त्याच्या समोरच मराठी अनुवाद अशा पद्धतीनें आपल्या 'प्रसाद' मासिकांत वेळोवेळीं छापल्या. मूळ आणि अनुवाद अशा या सुंदर सूक्तींचा संग्रह 'इंग्रजी काव्य-सूक्तींची पाणपोई' या नांवानें श्री. विंझे यांनीं १९५४–५५ सालीं प्रसिद्ध केला; त्याच पद्धतीनें प्रसिद्ध केलेल्या आणखी कांहीं सूक्तींचा हा दुसरा संग्रह आतां प्रसिद्ध होत आहे.

हा संग्रह सहज चाळून पाहिला तरीहि श्री. विंझे यांची परिश्रमशीलता आणि वृत्तप्रमुख कुणालाहि थक्क करून टाकील. या संग्रहाचीं अठ्ठावीस प्रकरणें आहेत आणि प्रत्येक प्रकरणांत एकेका विषयावरील सूक्ति आहेत. या विषयांचीं नांवेंच लेखकाच्या विशाल तत्त्वज्ञानी दृष्टिकोनाची साक्ष देतात—'ईश्वर, प्रार्थना'; 'जग, मानव, जीवन'; 'शरीराचे अवयव'; 'अंध, मूक, खाण्याचे प्रकार'; 'बाल्य, तारुण्य, वार्धक्य, मर्त्यता'; 'बीज, रोप, फुलें, वृक्ष'; 'मृत्यु, काल'; 'स्त्रीचें कष्टमय जीवन'; 'प्रेम'; 'वाङ्मय'; 'शब्द—सामर्थ्य, मौन, लेखन'; 'ज्ञान, अज्ञान, सुज्ञ, मूर्ख'; 'शील; विनय, गर्व'; 'सज्जन, दुर्जन'; 'प्रामाणिकत्व, दंभ'; 'सद्‌गुण, दुर्गुण'; 'पश्चात्ताप'; 'समर्थ, दुर्बल, शूर, भेकड'; 'कृति, कर्तव्य, चिकाटी'; 'सुख दुःख'; 'स्वातंत्र्य, गुलामगिरी, देशभक्त, देशद्रोही'; 'धन, दारिद्र्य, औदार्य, लोभ'; 'सत्य, असत्य'; 'आशा–निराशा'; 'क्षुद्र वस्तूंचा प्रभाव' इत्यादि.

एका भाषेंतलें विचारसौंदर्य आणि रचनाकौशल्य दुसऱ्या भाषेंत आणणें अतिशय दुष्कर. त्यांतल्या त्यांत एका देशी भाषेंतल्या वाङ्मयाचा दुसऱ्या देशी भाषेंत अनुवाद करणें थोडें तरी सोपें आहे. कारण मराठी, गुजराती, हिंदी, बंगाली इत्यादि देशी भाषा एकाच कुळांतल्या आणि एकाच संस्कृतीच्या आहेत. पण इंग्रजीसारख्या अगदींच परक्या भाषेंतल्या कवितेसारख्या बोधीव लिखाणाचें सुबोध आणि सुरेख मराठी पद्यांत भाषांतर करणें फारच कठिण. हें कठिण काम श्री. विंझे यांनीं किती यशस्वी रीतीनें केलें आहे, याचीं कांहीं सहज हाताला आलेलीं उदाहरणें देतों.

(१) As a lamp is choked by too much oil
A fire extinguished by excess of fuel
So is the natural health of the body
Destroyed by intemperate diet.

जैसा दिवा गुदमरे अतितैलदानें
अग्नीहि जाय विझुनी अतितर्पणानें ॥
तैसाच, अन्न अति खाउनिया, अघाशी–
नैसर्गिकी निज निरामयता विनाशी ॥

(२) Gather ye rosebuds while ye may,
Old Time is still a-flying
And this same flower, that smiles today
Tomorrow will be dying.

घेई वेचुनि तू गुलाबकलिका साधे तुला तोंवर,
राहे वाहत जीर्ण काल अजुनी वेगें पहा सत्वर ॥
हें जें सुंदर पुष्प आज दिसतें, उत्फुल्ल अन् हांसत
तें जाणार उद्यांच हाय ! सखये ! कोमेजुनी निश्चित ॥

(३) Love is said to be the egotism of two.

अहंकार व्यक्तिद्वयाचा मिळून ।
तया प्रीति हें नाव गेलें मिळून ॥

(४) A learned fool is more fool than an ignorant one.

अज्ञानी मूर्खाहुनि, विद्वान् मूर्खचि असे अधिक मूर्ख ॥

(५) Art thou poor, yet hast thou golden slumbers?
Oh! sweet content!
Art thou rich, yet is thy mind perplexed?
Oh! punishment.
Dost thou laugh to see how fools are vexed—
To add to golden numbers, golden numbers?
Oh! sweet content!
Work apace, apace, apace apace;
Honest labour bears a lovely face!
Cans't thou drink the waters of the crystal spring?
Oh! sweet content!

असुनि दरिद्री, सोन्याची तुज मिळे काय झोंप ती?
अहाहा! तुष्टि मधुर ती किती ॥

धनिक असोनी भ्रांत काय रे चित्त तुझें राहतें?
अरेरे! शासनची तुजसि तें ॥

जरि श्रीमंताच्या घरांत लक्ष्मी वसे ॥
लोभिष्ट करती सोन्यास्तव ते पिसे ॥

राशींवर चढविति राशि नवनव्या कसे ॥
पाहुनि हें तुज, येइ काय रे हास्य मुखीं सत्वरीं?
अहाहा! तुष्टि मधुर ती खरी!

सतत कार्य कर—जो प्रामाणिक कष्ट करुनि खातसे
तन्मुखीं सुंदरता दिसतसे !

होइ दुर्ग का पिउनि तुला रे जल, स्फटिक निर्झरीं !
अहाहा ! धन्य तुष्टि तव खरी ॥

(६) A ship lives in the water; but that getting into it, takes it to the bottom.

नौका जलावर तरे; जर का शिरे तें
नौकेमधें, तर तिलाच तळास नेतें ॥

(७) Straw upon straw make up a bundle.
Drop upon drop gather into a shower,
A little and little makes a great deal.
A grain upon grain a barnful of corn.

काडी काडी करुनि बनतो एक मोठाच भारा
थेंबें थेंबें जमुनि पडती वृष्टिच्या थोर धारा ॥
थोडें थोडें करुनि पुढतीं होतसे कार्य मोठें
दाणा दाणा जमवुनि भरे थोर कोठारही तें ॥

शेक्सपियर, शेख सादीसारखे कवि; सिसिरो, बर्कसारखे विचारवन्त; बायबलसारखे धर्मग्रंथ अशा शेकडों ठिकाणांहून मीं. विशेषतः यांतीं हीं सूक्तिमौक्तिकें वेचलीं आहेत. आबालवृद्ध मराठी वाचक, त्यांचा कृतज्ञतेनें स्वीकार करतील याबद्दल मला शंका वाटत नाहीं.

घांतिकुंज; ५ वी गल्ली
हिंदु कॉलनी; दादर; मुंबई

अनंत काणेकर
७ सप्टेंबर १९५८

● ● ●

# लेखकाचे दोन शब्द

इ. स. १९५५ च्या जानेवारींत पाणपोईचा पहिला खंड पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाला व (भाषांतरित काव्याच्या मर्यादित का होईना) पूर्वापरिचित वाङ्मयक्षेत्रांत माझा प्रवेश झाला. पुस्तकप्रसिद्धीपूर्वीच माझ्या भाषांतरांना विद्वान् रसिकांकडून प्रशंसा लाभलेली होती. पुस्तक झाल्यावर तर चोहोंबाजूंनीं माझ्यावर स्तुतिसुमनांचा अक्षरशः वर्षाव झाल्यासारखें झालें आणि या आनंदाला दृष्ट लागूं नये म्हणून आवश्यक एक गालबोटहि 'टाईम्स् ऑफ इंडिया' मधील परीक्षणकर्त्यानें लावलें. या लेखकानें माझ्या मूळ भूमिकेबद्दल गैरसमज करून घेऊन 'शाप शाप' म्हणून भुई धोपटली आहे. मूळ इंग्रजी उतारे हे सर्व 'काव्य' या सदरांत पडतात, असें थोडेंच माझें म्हणणें होतें? कांहीं काव्य, कांहीं गद्यसूक्ति, कांहीं तर न्यूटनच्या नियमासारख्या शास्त्रीय कारिका विद्यार्थ्यांना उपयोगी म्हणून मीं केल्या. आतां हें सर्व वृत्तांत बसविलें, एवढ्यावरूनच जणूं काय मी या सर्वांनाच काव्य समजतों असें गृहीत धरून या लेखकानें उगाच भडिमार केला आहे कीं—"विंझे यांना काव्य कशाला म्हणतात तें माहीत नाहीं. टेनिसननंतर इंग्रजी वाङ्मयांत काव्य-कल्पनेंत आमूलाग्र बदल झाला आहे. काव्याचा आस्वाद साकल्यानेंच घ्यावयाचा असतो. त्याच्या चकत्या कापून त्या विपयवार डब्यांत बंद करणें अशक्य! विंझे हे जुन्या जगांत वावरत आहेत. भाबड्या विद्यार्थि वाचकाला मार्मिक अर्थांच्या जाळ्यांत पकडून, विंझे हे, जुनें तें सोनें म्हणून जुन्या शिळ्या चीधपर सूक्ति या काव्य म्हणून पाजूं पाहात आहेत...." इत्यादि.

इंग्रजी उद्गारांचें, त्यांना काव्य म्हणा कीं न म्हणा, मी भाषांतर केलें तें यथार्थ आहे कीं नाहीं— त्यांतील गूढार्थ, सुघटता,

मार्मिकता, ध्वनि, रस, भावना, उपमा, अलंकार...... इत्यादि सर्व कसोट्या लावून माझी भाषांतरें वाचकांनीं करून तपासून परीक्षावीं, इतकीच वास्तविक माझी भूमिका होती. पण टाइम्सच्या लेखकानें वरीलप्रमाणें व्यर्थ गैरलागू भडीमार करीत असतां, त्याला त्याच लेखांत—

"The way Mr. Vinze can command metre and rhyme, and produce couplets and quatrains with such ease, is truely amazing. ........He has pounded and kneeded Marathi idiom with a virtuosity that could shame our poets proper. ...... He has squeezed every ounce of meaning out of the original."

"ज्या सहज सौकर्यानें विंझे हे श्लोकरचना करतात व त्यांचें वृत्तांवर जें प्रभुत्व आहे तें पाहून मन खरोखर थक्क होतें. —शुद्ध निर्मळ मराठी भाषासरणीचा कणीक विंझे यांनीं इतकी सुंदर सफाईनें मळून तिंबून तयार केली आहे कीं, तें पाहून आमच्या खच्या कवींनाहि लाज वाटावी.—मूळचा अर्थरस अगदीं शेवटच्या थेंबापर्यंत पिळून घेऊन विंझे यांनीं आपल्या भाषांतरांत तो आणला आहे."

अशी कबुली द्यावीच लागली आहे. यांत त्यानें केलेल्या टीकेची पूर्ण भरपाई होऊन, स्तुति करणारांनींहि दिली नाहीं, इतकी शाबासकी येऊन गेली आहे. त्यामुळें गालबोट काळें असलें तरी त्यानें, बालकाचें सौंदर्य अधिकच खुलून दिसावें तसें या इंग्रजी गालबोटानें झालें आहे.

ही टीका सोडली तर एकंदरीनें पाहतां, सुशिक्षित मराठी समाजाच्या इतक्या भिन्न थरांतून 'पाणपोई'चें पाणी झिरपलें आहे कीं, पाणपोईनें तृप्ति व त्यामुळें मनविषयीं

सद्भाव उत्पन्न झालेली माणसें अगदीं अकल्पित ठिकाणीं मला आढळून आलीं. गेल्या चारपांच वर्षांत इन्कम् टॅक्स् ॲपीलेट् कमिशनर, सेल्स टॅक्स् ॲपीलेट कमिशनर, दोंन रजिस्ट्रार्स ऑफ ॲश्युअरन्सेस् अशा ठिकाणीं माझीं कामें निघालीं — सर्वसाधारणपणें या ठिकाणीं माणसाचा छळच व्हावयाचा असतो व त्याच अपेक्षेनें भीहि वाटत होती. पण 'पाणपोई'चा लेखक ल. गो. विंझे तो मी हें कळतांच, जादूची कांडी फिरल्यासारखें होऊन, --छळ होण्याऐवजीं सन्मानपूर्वक मला वागविण्यांत येऊन, विनासायास व त्वरेनें माझीं कामें मार्गस्थ झालीं हें केवढें विलक्षण !

पूर्वी श्रावणमासांत पर्वतीच्या रमण्यांत, विद्वान ब्राह्मणांना त्यांच्या योग्यतेप्रमाणें, खुद्द पेशवे शालजोड्या वगैरे देत असत. तो निधि इंग्रज सरकारनें बाजूस ठेवून त्यांतून डेक्कन् व्हर्नाक्युलर ट्रॅन्स्लेशन सोसायटी ( महाराष्ट्र मंथोत्तेजक संस्थे ) मार्फत उत्कृष्ट पुस्तकांस पुरस्कार देण्यांत येतो. तें पारितोषिक पाणपोईला मिळालें. रकम ५० रु. चीच अल्प असली तरी दोन विद्वान चिकित्सकांनीं करून परीक्षा घेऊन, पेशव्यांची शालजोडी मिळण्यास मला पात्र ठरविलें, यामुळें मनाला मोठें समाधान झालें.

१९५० अखेर हृदयविकाराचे झटके आल्यानंतर, या भाषांतराचा छंद मी मुद्दाम लावून घेतला. दिवसभर आरामखुर्चीवर लोळे पिडून पडून हा उद्योग चाले. "यांना आतां नक्की वेड लागणार. तेव्हां ठाण्याच्या वेड्यांच्या इस्पितळांत जर यांना ठेवलें तर ठाणें शहरांतच जवळपास राहाण्यास आपल्यालाहि जागा शोधली पाहिजे." असें माझ्या पत्नीस खरोखरच वाटूं लागलें होतें. परंतु देवदयेनें मला तर वेड लागलें नाहींच परंतु पाणपोईच्या वाचनानें मात्र पुष्कळांना वेडें करून सोडलें आहे, याची खात्री पटून मला वेड लागण्याची भीति, माझ्या

पत्नीच्या मनांतून आतां बहुतेक नष्ट झाली असली पाहिजे असें मला वाटतें.

या सर्व आनंदावर कळस चढविला तो 'लोकमान्य' पत्रानें. 'लोकमान्या'चे संपादक श्री. पां. वा. गाडगीळ यांची व माझी, आम्ही दोघेहि ३० वर्षांचेवर मुंबईंतच असूनसुद्धां, ओळख तर नाहींच पण नुसती भेटसुद्धां झालेली नव्हती. पण 'पाणपोई' 'प्रसाद'मध्यें क्रमशः प्रसिद्ध होत असतां पुस्तक होण्यापूर्वींच श्री. गाडगीळ हे माझ्या भाषांतरावर नितान्त प्रसन्न झाले होते. त्यांना ते "अगदीं Classic" असा आवडता शब्द लावीत. 'पाणपोई' पुस्तक झाल्यावर त्यांनीं लोकमान्यांत पुस्तक परीक्षणाच्या सदरांत अभिप्राय वगैरे न लिहितां, स्वतंत्र अग्रलेख लिहून त्याचा अभूतपूर्व व कल्पनातीत असा गौरव केला. मी अनेक वर्षांपासून अनेक सार्वजनिक संस्थांतून अल्पस्वल्प जनसेवा केली आहे. यथाशक्ति आर्थिक साहाय्यहि अनेक सत्कार्यांना अर्पण केलें आहे. पण माझ्या मृत्यूनंतर वृत्तपत्रांतून कोठेंतरी शोकाच्या-दुखवट्याच्या चारदोन ओळी येण्यापलीकडे जगाच्या दृष्टीनें मला महत्त्व असेलसें वाटत नाहीं. परंतु जिवंतपणीं माझ्या लेखावर 'लोकमान्य' पत्रांत स्वतंत्र गौरवपूर्ण अग्रलेख येणें ही गोष्ट अपेक्षातीत झाली. जीवनाला धन्यता देणाऱ्या घटनांपैकीं एक विशेष, म्हणून याची स्मृति माझ्या हृदयांत आजन्म अक्षय्य राहील.

प्रथम खंडाची व या द्वितीय खंडाची रचना एकसारखीच आहे. प्रथम खंड झाल्यानंतर उमर खय्यामच्या सुमारें २५० रुबायांचें व शेख सादीच्या गुलिस्तॉंमधील २५० सुभाषितांचें मी भाषांतर केलें व हें एक नवीन भांडार मला लुटण्यास मिळालें. त्यांच्याही सुविचार धारा या पाणपोईंत मी सोडून दिल्या आहेत. भागानगरचे रेव्हरेन्ड् भारयांतले श्री. दातार यांनीं संन्यास घेतला होता. आतां ते ब्रह्मीभूत आहेत. यांनीं उमर खय्यामच्या सुमारें १२०० रुबायांचीं मूळ पार्शियनवरून इंग्रजींत कविताबद्ध

भाषांतरें केली आहेत. या इंग्रजी भाषांतरांना मी मुक्तहस्तानें उद्धृत करून त्यांचीं मराठींत भाषांतरें या खंडांत दिलीं आहेत. या त्यांच्या इंग्रजी कवितांचें ऋण मी अत्यंत कृतज्ञता बुद्धीनें येथें नमूद करून ठेवीत आहें.

प्रथम खंडाप्रमाणेंच याहि खंडांत विषय प्रकरणसंख्या २८ च आहे पण त्यांतले ५–६ विषय यांत नाहींत. त्याऐवजीं दुसरे ५–६ विषय आहेत. पण एकूण त्या खंडाच्या दीडपट हा मोठा आहे. हे उतारे निवडण्यांत व भाषांतरें करण्यांत मी काय काळजी घेतली आहे व काय बंधनें लावून घेतलीं आहेत, तें प्रथम खंडांत 'पाणपोई' हें नांव कां ठेवलें याच्या वर्णनाच्या रूपकांत गुरफटवून सांगितलेंच आहे.

हीं जीं बंधनें मी आपण होऊन लावून घेतलीं आहेत व तीं प्रामाणिकपणें पाळण्याचा प्रयत्न मी केला आहे, तीं पाळण्यानें माझा प्रयत्न कोठेंकोठें चांगला साधला नाहीं, तरी माझी प्रयत्नशीलता व प्रामाणिकपणा याबद्दल कोणी शंका घेऊं शकणार नाहीं.

श्री. य. गो. जोशी यांची माझी लहानपणापासून थोडीबहुत ओळख होती. पण "प्रसादमध्यें कविता घेण्याचें अजीबात बंद केलें आहे." असें प्रत्येक अंकांत छापीत असतां, 'पाणपोई' प्रकरणें वर्षानुवर्षे खास अपवाद करून ते छापीत आले. त्यांनीं हात धरून, आधार देऊन मजसारख्यार नवशिक्याला नव्या अनोळखी प्रांतांत धुडस्याधुडस्याखालतें वाटूं दिलें नाहीं. त्यांचे उपकार मी काय वर्णूं ! पण त्यांनीं हात दिला तो अनाठायीं किंवा अपात्रीं खास ठरला नाहीं. कारण केवळ पाणपोईसाठीं प्रसाद घेऊन वाचणारे व तेवढ्या पानांचा संग्रह करणारे वाचक मी पाहिले आहेत.

मराठी रसिक वाचकांनीं माझें अपेक्षेपलीकडे कौतुक केलें. त्यांचे यथोचित आभार मानण्यास योग्य ते शब्द मजपाशीं

नाहींत. भलत्या व्यवसायाचा मी माणूस भलत्या व्यवसायांत शिरलों, यामुळें खरें म्हणजे माझें जगभर हंसू व्हायचें. पण तसें न होतां मला गौरव लाभला, ही परमेश्वराचीच कृपा होय. पहिल्या खंडाप्रमाणेच महाराष्ट्रवाङ्मयसरस्वतीचे चरणीं या दुसऱ्या खंडानें मी शिंपडलेलें जल व वाहिलेलीं सुमनें ही सेवा श्रीसरस्वती देवी मान्य करून घेवो.

| ८२ खटाव बिल्डिंग, लालबाग,<br>मुंबई नं. १२<br>ता. १५-९-५८ | ल. गो. विंझे |
|---|---|



# पाणपोईवरील निवडक अभिप्राय

कांहीं विद्वान्, कांहीं साहित्यिक, कांहीं कवि,
कांहीं रसज्ञ वाचकांचे.

१. It is immensely creditable that (a textile) man like you should have produced such capital translations of memorable sayings and poets and prosaists in English literature.

प्रा. रा. कृ. लागू, M. A., पुणें.

२. अनुवाद करणाराचा मार्ग किती कंटकित असतो याची मला थोडीशी—स्वानुभवावरून—कल्पना आहे. म्हणूनच आपल्या यशस्वी निर्मितीबद्दल आपलें मनापासून अभिनंदन मी करूं शकतों. The arrow and the song याचा अनुवाद मला विशेष आवडला. माझींहि एक-दोन गीतें मला अशींच 'गवसलीं'.

डॉ. सर चिं. द्वा. देशमुख, I. C. S., नवी दिल्ली,
भारताचे भूतपूर्व अर्थमंत्री, विश्वविद्यालय-अनुदान समिति-प्रमुख.

३. आपण आंग्लकवींच्या सदुक्तींचा जो मराठींतून पद्यात्मक अनुवाद केला आहे, तो फारच सरस उतरला आहे. आंग्लकवींचें मर्म व भाव त्यांत पूर्णपणें उतरला आहे. मराठी वेष त्यावर बेमालूम चढला आहे. त्यामुळें तें भाषांतर आहे असें वाटत नाहीं. आंग्लभाषानभिज्ञ मराठी वाचकास आपल्या या ग्रंथामुळें अनेक श्रेष्ठ दर्जाच्या आंग्लकवींच्या सत्कृतींतील सदुक्तींचा परिचय होईल. मराठी लेखक व वक्ते यांसहि फार उपयोग होईल...... माझ्या दुखण्यांत आपलें पुस्तक चाळण्यानें मनाला आनंद होऊन दुःखाचा विसर पडत होता; त्यांतील सूक्तींचा स्वाद

घेताना व्याधिपरिहार होत होता......आपल्या हातून महाराष्ट्र-शारदेची अशीच सेवा घडो.

लोकनायक डॉ. मा. श्री. अणे, B. A. LL. B., भूतपूर्व-राज्यपाल, बिहार.

४. अनुवाद तोच सर्वोत्कृष्ट की जो वाचीत असतां तो अनुवाद आहे असें प्रतीत होत नाहीं. या कसोटीला " It is the perfection of art to conceal art " या न्यायानें 'पाणपोई' पूर्णपणें उतरते. शिवाय हा अनुवाद काव्यमय असल्यानें व हें काव्य सरस वठलें असल्यानें काव्यगुणहि पुस्तकांत उतरला आहे ! स्वतंत्र कल्पना व विचार लेखकानें ( श्री. विंसे यांनीं) काव्यरूपांत प्रकट केले तर "मी कवि तर नाहींच नाहीं" हा त्यांचा अविश्वास निर्मूल होय हें सहजच सिद्ध होईल ! इंग्रजी व मराठी या दोन भाषांवर प्रभुत्व व सुभाषितांची निवड करण्यांत प्रकट झालेलें सहृदयत्व इत्यादि अनेक गुणांचा आविष्कार या सुंदर पुस्तकांत झाला आहे. इति शम् ।

डॉ. वि. म. आपटे, एम्. ए. पी. एच्. डी. ( केंब्रिज ) संस्कृत व तत्वज्ञानाचे प्राध्यापक —सागर विश्वविद्यालय.

५. आपली 'भूमिका' सरस उतरली आहे.भावे यांच्या महाराष्ट्र सारस्वताला त्यांनीं लिहिलेल्या प्रस्तावनेची आठवण होण्याइतकी आपली गद्यलेखनशैली सुरेख आहे. काव्यांचे अनुवाद जसे सुंदर करतां त्याप्रमाणें इंग्रजी गद्यग्रंथाचेहि करण्याचें सामर्थ्य आपल्या भाषाशैलींत आहे.

डॉ. शं. दा. पेंडसे, एम्. ए; एम्. ओ. एल्.; पी. एच्. डी.; वेदान्ततीर्थ. भूतपूर्व मराठीचे प्राध्यापक हिस्लाप कॉलेज; अध्यक्ष—मराठी साहित्य संमेलन, पंढरपूर.

६. माझा न साहित्य या विषयांत मी तज्ज्ञ नाहीं. पण मीं जें तुमचें साहित्य अवलोकन केलें तें मला फार आवडलें. इंग्रजी काव्यसूक्तींचीं पद्यमय भाषांतरें सरस उतरलीं आहेत, याबद्दल मी तुमचें अभिनंदन करतों.

प्रा. दे. द. वाडेकर, एम्. ए., तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक,
फर्ग्युसन कॉलेज, पुणें.

७. (शा. वि.)

लोकीं बोलति "स्त्रीस येइ न कधीं, अन्य स्त्रियेची दया
तैसें अन्य कवीकृतीहि कविला येई न चाखावया ॥"
खोटें यास कसें म्हणूं ? कवि नसे, मी, हेंच आहे खरें;
वाटे सुंदर अन्यथा मज कधी, ही 'पाणपोई' बरें ? ॥

आहे सुंदर मूळ काव्य; अनुवादींही दिसे चातुरी
काढावा जरि दोष, ओटकपणा भासून येतो परी ॥
संदर्भांत विशिष्टशा, असति जे उद्‌गार, ते अन्यथा
एकाकी, विपरीत दाविति कधीं, त्या त्या कवीच्या मता ॥

कोणाला शिकणें असेल, कविता भाषांतराची कशी ?
छंदोबद्ध तशी स्वतंत्र रचना किंवा करावी कशी ? ॥
विद्यार्थ्यां उपयुक्त होइल अशी, ही 'पाणपोई' खरी
येथें वाहतसे जणूं सुविमला, मंजुस्वना वैखरी ॥

श्री. गो. स. फडके, बी. ए. एल्. एल्. बी., पनवेल,
सहृदय रसिक व कवि.

८. योगायोगानेंच आपली 'पाणपोई' वाचली. मी तहानेलेलाच होतों. थोडेंसें पाणी प्यालों. आवडलें—आणखी प्यालों. आणखी आवडलें—आणखी प्यालों. पोट भरलें पण तृषा शमली नाहीं. प्रथम कांहीं शंका होती 'पाणी कसें असेल ? कुठून आणलें

असेल ! आणतांना वाटेत !......' पण छे ! म्हणून लिहावेंसें वाटतें—

"Some energy is lost in transit"
Is the law of a Scientific circuit.
It seems, to you, the law does not apply
For, as is the watersource, so is your
supply !!"

श्री. यशवंत देव, B. SC., कवि, संगीत दिग्दर्शक, मुंबई.

९. ( दिंडी )

सूर्यकिरणें लोलकामधुनि जातीं ।
इंद्रधनुच्यापरि रम्य साज घेतीं ॥
विविध रंगांच्या छटा कौशलानें ।
शब्दटंग् गुंफिले तव कलेनें ॥ १ ॥

ज्ञानदेवींतिल ढंग अमृताचा ।
ललित शब्दांचा छंद वामनाचा ॥
टिळक कविची माधुरी प्रसादाची ।
तव श्लोकीं अनुभवीं रसिक साची ॥

गूढ किमया मानवी मनीं राहे ।
काव्यरूपें तव चिरकाल वाहे ॥
स्वयें कष्टी, परि गान गोड गात ।
काव्यचंडोला ! स्वतां हो अनाथ ॥

—श्री. अ. स. भिडे ( गुरुजी ), बी. ए. बी. टी., मुंबई.

१०. तुम्हांला परमेश्वरानें निद्रानाशाची व्याधि दिली. पण त्या 'जागृती'चा उपयोग करून मराठी वाङ्मयांत तुम्हीं अनमोल भर घातलीत··· ··परमेश्वराची खोडी जिरविलीत. महाराष्ट्र सारस्वत तुमचें ऋणी राहील.······

एक वाचक

- ११. ' लोकमान्य ' पत्रातील अग्रलेख ११-३-५५

इंग्रजी काव्यसूक्तींची ' पाणपोई '

······काही वर्षांपूर्वी श्री. लक्ष्मण गोविंद विंझे यांनी ' ऋग्वेदी संध्या , 'पुरुषसूक्त' व ' परापूजा ' यांची केलेली सुरस कविताबद्ध भाषांतरें ' प्रसाद ' मासिकांत प्रसिद्ध झाली, तेव्हांच 'इतका उत्कृष्ट अनुवाद करणारे हे विंझे कोण ?' असा प्रश्न साक्षेपी वाचकांच्या मनांत वारंवार उभा राहिला. पुढें १९५३ साली इंग्रजी काव्यसूक्तींची श्री. विंझे यांनी केलेली उत्कृष्ट भाषांतरें प्रसिद्ध होऊं लागली. तेव्हां सर्वच वाचकांचें त्यांच्याबद्दलचें कुतूहल वाढलें व हा सूक्तिसंग्रह पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाला तर मराठींत सुभाषितांचा उत्कृष्ट ठेवाच मिळेल असें इतर अनेकांच्याहि मनांत आलें······ श्री. ल. गो. विंझे हे अशा रीतीनें जवळजवळ एकदम साहित्यिक–कवि म्हणून शेंकडों वाचकांस परिचित झाले आहेत. ·· ( यानंतर माझ्या ' भूमिके 'तील पाणपोईसाठीं हें पाणी आणून वाचकास देईपर्यंत मी काय काय काळजी व दक्षता बाळगली याबद्दल मोठा उतारा आहे ) ···· अनुवादकाची भूमिका नीट समजावी या हेतूनेंच केवळ नव्हे तर इतर भाषांतून मराठींत अनुवाद करणाऱ्यांना, आपण अनुवादासाठीं किती कष्ट घेतले पाहिजेत व आपल्या अनुवादाची योग्यता ठरविण्यासाठीं कोणती कसोटी बाळगली पाहिजे याची जाणीव व्हावी या हेतूनेंहि हा उतारा आम्ही येथे दिला आहे ······या संग्रहांतील कोणतेंहि पान उघडून मूळ कवितापंक्ति, सूक्ति किंवा म्हणी वाचल्या व त्यासमोरील त्यांचें भाषांतर वाचलें कीं, श्री. विंझे यांच्या अनुवाद-कौशल्याबद्दल सानंद आश्चर्य वाटल्यावांचून राहात नाहीं. श्री. विंझे यांची भाषा प्रसादपूर्ण व नादमधुर आहे. तिच्यांत सहज सुंदरता आहे. भाषांतरांत मूळांतील अधिकांत अधिक अर्थ आणण्याची शिकस्त करणें; शक्यतों मूळास सोडून न जाणें, इतकेंच नव्हे तर शक्यतों कमींत कमी

शब्दांत मूळांतील अर्थ वृत्त, यमकांची बंधनें संभाळून व्यक्त करणें असा अनुवादकाचा बाणा आहे. तो वाचकाला भाषांतराच्या ओळीओळींतून जाणवल्याशिवाय राहात नाहीं. इंग्रजी व मराठी दोन्ही भाषांवर प्रभुत्व असणाऱ्या एखाद्या चोखंदळ वाचकानें अगदीं प्रतिज्ञा करून भाषांतराच्या चुका काढण्याचेंच ठरविलें तर त्याला कांहीं चुका म्हणा, कांहीं न्यूनता म्हणा मुळींच दाखवितां येणार नाहीं असें मुळींच नाहीं. एखादा पद्यपंडित कांहीं वृत्तदोष दाखवूं शकेल. कांहीं लोकांना कल्पना विपर्यासाचीं उदाहरणें दाखवितां येतील. पण सर्वांनीं काढलेल्या चुकांची व न्यूनांची संख्या इतकी कमी भरेल कीं, रसिक वाचकास अनुवादकाच्या उत्कृष्ट अनुवादकौशल्यांत उणेपणा आहे, असें मुळींच वाटणार नाहीं. अशा या पाणपोईची सर्वोच्च साहित्यिकांनीं मुक्तकंठानें प्रशंसा केली यात नवल तें काय!

·······श्री. विंझे यांची ही 'पाणपोई' योग्य समयीं प्रकाशित होत आहे. सर्व शिक्षण इंग्रजींतून देण्या-घेण्याची प्रवृत्ति कमी कमी होऊन मातृभाषेंतून शिक्षण देण्या-घेण्याची प्रवृत्ति वाढत आहे हें उचितच आहे ··· पण विशाल ज्ञान मिळविण्याचें आज उपलब्ध असलेलें साधन इंग्रजी भाषा हेंच आहे. आणखी अनेक वर्षे हेंच साधन आपणांस पेलतां येण्याजोगें आहे. इंग्रजींतील उत्कृष्ट विचार व ज्ञान प्रादेशिक भाषांत आणण्यासाठीं योजनाबद्ध प्रयत्न सरकारनें व विद्वानांनीं मिळून केले पाहिजेत. त्यासाठीं स्वभाषेंत इंग्रजींतून व अन्य भाषांतून उत्कृष्ट बेमालूम सहज सुंदर भाषांतरें करूं शकणारांच्या पलटणी अनेक वर्षे उभ्या कराव्या लागतील, पोसाव्या लागतील. देशी भाषांत सर्व आधुनिक ज्ञान-विकास आल्यानंतरच खऱ्या आधुनिक ज्ञानाचा अभ्यास व संशोधन यांना उत्स्फूर्त चालना मिळूं शकेल.

श्री. विंझे यांनीं या विराट कार्यांतील महत्त्वाचा वांटा उचलला आणि उत्कृष्ट जिवन्त भाषांतराचा आदर्श इतर अनुवादकांसमोर

ठेवला, याबद्दल आम्ही त्यांचें मनःपूर्वक अभिनन्दन करतों. इंग्रजीमधील उत्तमोत्तम विचार या पुस्तकांत मूळासह भाषांतरले आहेत. त्यांचा शाळा-कॉलेजांतून अभ्यास व्हावा. महाराष्ट्रांतील सुजाण पालकांनीं आपल्या मुलांमुलींकडून या ग्रंथांतील काव्य-पंक्ति पाठ करून घ्याव्या व इंग्रजीशीं त्यांचा परिचय करून द्यावा. गेल्या पाव शतकांत शाळा-कॉलेजांतून पाठांतराची व अनुवादकलेची अक्षम्य आबाळ चालली आहे. ती शक्य तितक्या लवकर सरकारनें, शिक्षकांनीं व पालकांनीं बंद केली पाहिजे. इंग्रजी आठव्या इयत्तेपासूनच्या वर्गांत या पुस्तकास स्थान मिळालें व शिक्षकांनीं जाणतेपणानें या पुस्तकाचा उपयोग केला तर ती आबाळ नाहींशी होईल व आपली तरुण पिढी अधिक सुबुद्ध होईल.



## विषयानुक्रमणिका

# Chapter 1

## God...Prayer

### (1) Hymn. (Joseph Addison)

How are Thy servants blest, Oh Lord!
How sure is their defence;
*Eternal wisdom is their guide;*
Their help Omnipotence! (1)

In foreign realms and lands remote,
Supported by Thy care,
Through burning climes I passed unhurt
And breathed the tainted air! (2)

Thy mercy sweetened every toil
Made every region please.
The hoary Alpine hills it warmed
And smoothed the Tyrrhene seas. (3)

In midst of dangers, fears & death
Thy goodness I will adore;
And praise Thee for the mercies past
And humbly hope for more. (4)

My life—if Thou preservest my life—
*Thy sacrifice shall be,*
And death, if death must be my doom
Shall join my soul to Thee! (5)

### (2) A Prayer

Give me a good digestion, Lord!
And also something to digest!
Give me a healthy body, Lord,
With sense to keep it at its best! (1)

## प्रकरण १

### ईश्वर....प्रार्थना

( शार्दूलविक्रीडित )

होती या जगतांत धन्यचि किती देवा ! तुझे चाकर
त्यांचें रक्षण निश्चयें करितसे कैशी तुझी पांखर ।।
दावी मार्ग तयां चिरंतन अशी प्रज्ञा तुझी ईश्वरा !
सर्वांना, तव सर्वशक्तिमयता हाची खरा आसरा ।। १ ।।

गेलों मी परक्या विदेशिं अथवा त्या दूर देशांतरीं
खात्री कीं, मम तूंच वाहशिल रे चिंता तुझ्या अंतरीं ।।
जाळी आतप चंड जेथ, फिरलों कांहीं न होतां तिथें
तूंची वांचविलेंस, दूषित अशी सारी हवाही जिथें ।। २ ।।

झाले कष्टहि गोड सर्व–तव तें देवा ! दयेचें फल
सारे देशविदेश नित्य गमले चित्ता किती सुंदर ।।
आणी कव, हिमालयांत वसतां, ऐशी कृपा भव्य ही
होतां वादळ घोर, शांत करिते जी क्षुब्ध अब्धीप्रति ।। ३ ।।

धोके, भीति, नि मृत्यु नित्य वसले मातें जरी घेरुन
देवा ! मंगलकारिता तव सदा पूजीत मी राहिन ।।
केली आजवरी कृपा प्रभु ! तुवां त्याची स्तुती गाउनी
"द्यावें वाहुन आणखी" प्रणत मी आशा धरी ही मनीं ।।४।।

देवा ! वाचविशील तूं मज, तरी हें सर्वही जीवन
यज्ञांतीलचि आहुतीसम असो पायीं तुझ्या अर्पण ।।
किंवा मृत्यु ! जरी कपाळिं मम या मृत्यूच आलेखिला
आत्म्याचीं मम भेट तोच घडवो देवा ! तुझ्या अंतरा ।। ५।।

### (२) प्रार्थना (वसंततिलका)

दे चांगली पचनशक्ति मला सदैव
कांहींतरी पचविण्यासहि देह, देव ! ।।
देई प्रभो ! तनु निरोग, नि तीच ठेवीं
अत्यंत जी सम, अशी मज बुद्धि द्यावी ।। १ ।।

Give me a healthy mind, Lord
To keep the good & pure in sight.
Which, seeing sin, is not appalled
But finds a way to set it right. (2)

Give me a mind that is not bound
That does not whimper, whine or sigh;
Don't let me worry over much
About the fussy thing called "I". (3)

Give me a sense of humour, Lord!
Give me the grace to see a joke;
To get some happiness out of life
And pass it on to other folk. (4)

(3) **Thou art O Lord!** ( Thomas Moore. )

Thou art O Lord! the life & Light
Of all this wondrous world we see;
It's glow by day, its smile by night
Are but reflections caught from Thee!
Whereever we turn, Thy glories shine
And all things fair&bright are thine : (1)

When day with farewell beam, delays
Among the opening clouds of even;
And we can almost think we gaze
Through golden vistas into heaven;
Those hues that make the sun's decline
So soft, so radiant,Lord ! are Thine! (2)

Like some dark beautious bird, whose plume
Is sparkling with unnumbered eyes—

When night with wings of starry gloom
Overshadows the earth and the skies,
That sacred gloom, those fires divine,
So grand, so countless, Lord! are Thine (3)

When youthful spring around us breathes,
Thy spirit warms her fragrant sigh;
And every flower the summer wreathes
Is born beneath that kindly eye!
Whereever we turn, Thy glories shine
And all things fair&bright are Thine! (4)

**(4) O, Thou who dryst the mourner's tears!**

(Thomas Moore)

O, Thou who dry'st the mourner's tears!
How dark this world shall be,
If, when deceived and wounded here
We could not fly to Thee! (1)

The friends who in our sunshine live,
When winter comes, are flown.
And he who has but tears to give,
Must weep those tears alone! (2)

But Thou wilt heal that broken heart
Which like the plants that throw
Their fragrance from the wounded part
Breathes sweetness out of woe! (3)

When joy no longer soothes or cheers
And even the hope that threw
A moment's sparkle on our tears
Is dimmed and vanished too! (4)

तैशी भीषण, तारकांकित निशा काळ्या स्वपक्षाचिया–
खालीं झाकुनि टाकिते जधिं जगा, साऱ्या नभालाहि या–
त्यांची भीषणता पवित्र, जळत्या स्वर्गीय त्या ज्योति ही
ऐशी भव्य ! अशी अनंत करणी ! देवा ! तुझी सर्वही ॥ ३ ॥

नाचे नूतन हा वसंत भवतीं सद्गंध वायूपरी
चैतन्यें निज, तूंच उष्ण करिशी निःश्वास त्याचा परी ॥
जें जें भूपविंतें निदाघसमया, प्रत्येक तें पुष्प रे
जन्मे ज्योतिष्मान घेउनि तुझें चैतन्य नेत्रांतलें ॥
न्यावी दृष्टि तिथें तुझीच विभवें तेजस्वि तीं शोभतीं
जें जें सुंदर आणि भास्वर जगीं, देवा ! तुझी ती कृति ॥ ४ ॥

## (४) शोकाश्रुशोषक अशा परमेश्वरा रे !

(वसंततिलका)

शोकाश्रुशोषक अशा परमेश्वरा रे !
होईल हें जग किती तमपूर्ण सारें– ॥
हांसां मणांकित नि वंचित या जगांत
तूंतें न पाहुं शकलों जर आश्चर्य ! ॥ १ ॥

जे कां सुमित्र अमुच्या विभवप्रकाशीं
येई जधीं शिशिर, ते त्यजिती अम्हांसी ॥
देण्यास अश्रुविण नान्य उरे जयातें
त्या एकटेंच रडणें नशिबांत येतें ॥ २ ॥

तें भग्नही हृदय तूं परि सांधणार
दुःखांतुनी स्रवत जें मधुगंध थोर ॥
जैसें, कुन्हाड पडतां हृदयांत खोल
दे त्या मणांतुनि सुगंधचि देवदार ॥ ३ ॥

दे शीत–सांत्वन अशा सुरसा प्रमोद
आशाहि अधुक बनून विशुद्ध होत–
जी, अश्रुही घळघळां गळतांच मागें
रत्नांपरी झळकवी क्षणमात्र तेजें ॥ ४ ॥

O, who would bear life's stormy doom
Did not Thy wing of love,
Come, brightly wafting through the gloom
Our peace branch from above? (5)

Then sorrow,touched byThee grows bright
With more than raptures ray;
As darkness shows worlds of light
*We never saw by day!* (6)

### (5) *Bless our homes!*

Bless our homes, O Lord! we pray,
Make them safe by night & day;
Bless these walls so firm & stout
Keeping want & trouble out! (1)

Bless these roofs and chimneys tall
Let Thy peace lie over all;
Bless our doors that they may prove
Ever open to joy & love! (2)

*Bless these windows shining bright*
Letting in God's heavenly light.
*Bless the fires ablazing there*
With smoke ascending like a prayer. (3)

Bless the people there within,
Keep them pure & free from sin;
*Bless our priests that they may lead*
Us, O Lord, to come to Thee! (4)

*Bless us all, that one day we*
May dwell, O Lord! with Thee. (5)

सुप्रीतिपंख जडवून सुशांति द्याया
तेजें विनाशित तमा, करुनी जगीं या–
येतास तूं न, तर शोधिल कोण या रे
हें वादळी भयद जीवन घोर सारें ! ॥ ५ ॥

प्रत्यक्ष रूपें जितुका झळके न तेजें
त्वत्स्पर्श, दु:ख तितुकें उजळील माझें
तारे असंख्यचि जसे तम दाखवीतें
जे ना प्रकाशि दिसले दिवसा कधीं ते ॥ ६ ॥

## (५) प्रार्थना (उपजाति)

प्रभो ! गृहाऱ्यावर आमच्या या । तुझ्या कृपेची धर शीत छाया ॥
रात्रींत तैशी दिवसींहि, तात । सदा सुसंरक्षित तीं असोत ॥
भिंतीवरी या दृढ अन् बलिष्ठ । तुझी कृपादृष्टि असो, वरिष्ठ ! ॥
उर्णाव, दारिद्र्य, तशा विपत्ति । बाहेर ठेवोत तयांस भिंती ॥१॥

हीं छप्परें आणि धुराड्हि उंच । असो कृपा त्यांवरही तुझीच ।
उन्हें धुरें जीं परितप्त त्यांस । देई तुझ्या शीतल शांततेस ॥
दारांवरीहि अमुच्या सदैव । कृपा असावी तव देवदेव ! ॥
घेण्यास सुप्रीति नि मोद आंत । दारें सदा तीं उघडीं असोत ॥२॥

वातायनांची झळकोच कांच । व्हावी कृपा त्यां तरिही तुझीच ॥
जो दिव्य देवाघरचा प्रकाश । त्यातें मिळो त्यांमधुनी प्रवेश ॥
गृहाग्नि जे आमुचिया चुलींत । राहोत ते त्वत्कृपया ज्वलंत ॥
हुताग्निचा धूर चढो नभांतीं । सुप्रार्थना स्वर्गिं चढे जशी ती ॥३॥

गृहांत सर्वांवरतींहि देवा । दृष्टी कृपेचीच सदैव ठेवा ॥
ठेवी सदाचेच तयां पवित्र । पापाहुनी ठेव तयांस दूर ॥
तुझ्या कृपेचें वरदान ज्यांसी । असेच लाभोत गुरू अम्हांसी ॥
जे नित्य होऊन सुमार्गदर्शी । नेतील आम्हांस तुझ्याचपाशीं ॥४॥

अंतीं, जगीं सर्व जनांवरी हो । प्रभो ! कृपेची तव दृष्टि राहो ॥
कधींतरी येउं तुझ्या पदाशी । स्वर्गीय शांतींत वसावयाशीं ॥५॥

(6) Traherne

Before Thy prescience, Power Divine!
What is this idle sense of mine?
What all the learning of the schools?
What sages, priests, and pedants? Fools! (1)
The world is Thine, from Thee it rose,
By Thee it ebbs, by Thee it flows.
Hence worldly lore! by whom is wisdom shown?
The Eternel knows, knows all, & He alone! (2)

(7) Omar Khayyam (Tr. by Fitzerald)

Whose secret presence through creation's vains
Running quicksilverlike eludes your pains.
Taking all shapes from Maha to Mahi, and
They change & perish all!—But He remains! (1)

A moment guessed–then back behind the fold
Immerst of darkness, round the drama rolled!
Which for the pastime of Eternity
He doth Himself contrive, enact, behold! (2)

(8) Omar Khayyam (Tr. R. P. Bhajiwalla)

I fight against my passions, but in vain,
The thought of my own doings gives me pain;
I know Thou wilt forgive me Lord! but still
My shame, that Thou hast watched doth remain!

◆◆◆

## ( ६ ) ( शार्दूलविक्रीडित )

पूर्वज्ञान, सुदिव्यशक्ति ! तव हें पाहून, त्याच्यापुढें
वाटे अर्थविहीन ज्ञान दुबळें माझें किती बापुडें ॥
शाळांतून नरास शिक्षण मिळे, त्याची किती धांव ती
साधू, भिक्षु, नि सांप्रदायिक जगीं, हे मूर्ख सारे किती॥१॥

सारें विश्व तुझेंच रे ! विकसलें सारें तुझ्यांतून तें
सृष्टयन्धीस तुझ्या बळेंच भरती ओहोटिही लागते ॥
ज्ञाना ऐहिक ! बोल ! कोण असली ही सुज्ञता दावितो ?
जाणे एक अनंत ईश सगळें-तो एकची जाणतो ॥२॥

## ( ७ ) ( शार्दूलविक्रीडित )

सृष्टीच्या धमन्यांतुनी निभृतसें अस्तित्व जें वाहतें
जें जातां धरण्या, करांमधुनिही पाण्यापरी धांवतें ॥
जन्तूपासुनि-पर्वतासम अशीं सारीं स्वरूपें धरी
होतां तीं बदलोनि नष्ट, अवघीं, तें एक राहे परी ॥१॥

भासावें क्षणमात्र !- आणि पडद्यामागें दडावेंच तें
अंधारांतचि, चक्रवत् फिरुनिया हें नाटय कीं लोपतें ॥
ऐसा खेळ करी प्रभू निज चिरंजीवीप्रती रंजक
योजी, नाटय करी, नि तेंच बघण्या होई स्वयें प्रेक्षक ॥२॥

## ( ८ ) ( शार्दूलविक्रीडित )

मोहार्थी झगडा सदैव करितों-तो व्यर्थची होतसे
कृत्यांचा ममची विचार हृदया पीडा सदा देतसे ॥
देवा ! तू मजला क्षमाच करिशी ही निश्चिती रे जरी ।
पापें मी करितां, तुवां बघितलें !-ही लाज राहे परी ॥१॥

◆◆◆

## Chapter 2

### World, Man, Life:—

**(I) Omar Khayyam (Fitzgerald) This is life !-**

Whether at Naishapur or Babylon
Whether the cup with sweet or bitter run,
The wine of life keeps oozing drop by drop
& Leaves of life keep falling one by one.(1)

Think, in this battered caravanserai
Whose portals are alternate night & day
How Sultan after Sultan with his pomp
Abode his destined hour & went his way!
(2)

'Tis but a tent, where takes his one day's rest
The Sultan—to the realm of Death addresst.
The Sultan rises & the dark Ferrash
Strikes and prepares it, for another guest.
(3)

A moment's halt—a momentary taste—
Of being, from the well amid the waste.
And Lo! The phantomCaravan has reached
The Nothing it set out from;-Oh make
haste! (4)

We are no other than a moving row
Of magic shadow-shapes that come & go—
Round, with the sun-illumined lantern held
In the midnight, by the Master of the show!
(5)

प्रकरण २

## जग, मानव, जीवन

( शार्दूलविक्रीडित )

नैशापूर नि बॅबिलोन, अथवा कोठेंहि राहो कुणी
मद्यें गोड, कडू कशींहि भरुनी राहोत पेल्यांतुनी ॥
मद्याकोशम थेंब थेंबचि उतू जाई पहा जीवन
पर्णे जीवनरूप नित्य गळतीं एकेक कोमेजुन ॥१॥

जाणा, जीवन छिन्नभिन्न पडक्या त्या धर्मशाळेपरी
एका आडचि एक रात्र, दिन हीं दारें जिचीं जाहलीं ॥
एकामागुनि एक थोर नृपती ऐश्वर्यशाली महा
थोडा काळ नियुक्त राहुनि इथें गेले स्वमार्गे पहा ! ॥२॥

विश्रांतिस्तव एकची दिन, जणूं तंबूच हें जीवन
जातां मृत्युपुरीस मार्गि नृपती जाती इथें थांबुन ॥
हाले तो तळ ! 'काल' सेवक क्षणीं तंबूस त्या आवरी
येई मागुनि, त्यादुज्या अतिथिच्यासाठीं तयारी करी ॥३॥

थांबावें क्षण ! जीवनोदक जिथें प्यावेंच एक क्षण
ओसाडींतिल वापितून; अवघें ऐसेंच हें जीवन ॥
शून्योत्पन्न नि भासमात्र, पुढतीं तांडा पहा चालला—
शून्या जाउनि पोंचला क्षणभरें—तूंही करी रे त्वरा ॥४॥

सूर्याचा जणुं दीप; मानव जणूं चित्रेंच कीं हालतीं
जादूगाराचे भव्यरात्रि फिरवी तीं त्या दिव्याभोंवतीं—॥
एकामागुनि एक नित्य फिरती, येती नि जाती तशें
सारें जीवन भासमात्र, फिरतें, या मानवाचें दिसे ॥५॥

Sheikh Saadi ( Gulistan ) Written on king
(2) Feridun's Palace gate—

This life's a show, my brother, endureth for none !
Give thy heart to the Maker of all things alone.
To the kingdom of this world, trust nowise; 'twill glide
From thy grasp–as of those who lived & died

(3) Sdaiahe Shik

Whosoever has washed his hands of living
Alone can utter his mind,without misgiving.

(4) Omar Khayyam ( Tr. V. M. Datar )

Some ruled the world–They wished to make it tame
But left it here–and went the way they came !
You think that you will stay for ever here !
Your fathers too from first thought the same.
(1)

The old & new have all their passage booked,
And each will eat the porridge he has cooked;
This world is base, will bind herself to none,
On all who came & went she coldly looked !
(2)

Thou wert devoid of waking, hunger, sleep
Four elements gave their stores for thee to keep
But each will wrest from thee what once it gave
Denuded thus, they cast thee in the deep ! (3)

राजा फेरिदुननें आपल्या प्रासादद्वारीं असें लिहून ठेविलें होतें—
( शार्दूलविक्रीडित )

भाई ! जीवननाट्य हें; उमज कीं कोणाहिसाठीं नसे ॥
सृष्टयुत्पादक ईश्वरा, हृदय तूं, एकासची दे कसें ॥
राज्याचा न जगावियाहि धरणें विश्वास; तें जातसे
हातांतून सुटून, जात-मृत जे त्यांच्याहि गेलें जसें ॥

( ३ ) शा. वि.

आशा जो नर जीवनाविषयिंची संपूर्ण सोडीतसे
बोलें, निर्भय, तोच एक शकतो, चित्तांतलें स्वच्छसें ॥

( ४ ) शार्दूलविक्रीडित

पृथ्वीला नमवावया तिजवरी केलें कुणी राज्य, ते
झाले, सोडुनि तीस येथचि, परी आले तसे चालते ॥
" मी राहीन चिराय " यापरि जरी वाटे तुला अंतरीं
पूर्वीपासुनि हेंच, पूर्वज तुझे मानीत आले परी ॥१॥

जाणें सर्व जुन्यानव्यांस ठरलें ! प्रस्थानही ठेविलें
दोघे भाक्षिति निश्चयें सकल जें त्यांनीं स्वयें रांधलें ॥
सृष्टी नीच असे ! कुणाअहि कधीं राहे न ही बाधली
यती जाति-तयांस निर्दयपणें पाहात ही राहिली ॥१॥

तूंतें जाग्रति, भूक, झोप नव्हती-होती जधीं ही स्थिति
भूतें चार, तदा तुला निज घनें ठेवावया अर्पिती ॥
सारेंही हिसकून घेति परि तीं,-तूंतें दिलें जें कधीं
एसें नग्न करून फेकिति तुला, तीं सोल अन्धीमधीं ॥३॥

Suppose ye sway the whole world-what do you score?
And what if words rehearse your praises more?
Suppose you lived in pleasure a hundred years
And a hundred more,-at last what do you store?
(4)

What hope has this fatal inn for the wise?
Why does he hanker after annas & pies?
For, when he hoards & thinks of settling down
His hand is pulled by Death with "Hie arise!"
(5)

How fine the world has dressed ! she makes us gay
Each man aspires that she should grace his day
Ofcourse, she seems a dainty maid to court
But then, Alas ! she only cheats to slay. (6)

This actress world, will dance & go; arise
Thou list her not and be sedate & wise
If loyal, she would have stayed with men of yore
Not leer at thee, with these her wistful eyes.
(7)

(5) Cowper

Men deal with life
as children with their play
Who first misuse,
then cast their toys away !

पृथ्वीचें मिळवून राज्य अवघ्या वा काय लाभे तुला ?
शब्दांची स्तुतिही भरीस मिळुनी, ती काय देई फला ?
सौख्यें राहसि तूं शताब्द अथवा त्याच्यावरी शंभर
अंतीं काय भरून ठेविसि नरा ! भांडार मोठें तर ? ॥४॥

प्राणी घातक या सराईंत कुठें आशाच मुक्कास या !
का धांवे परि हा सदा मिळविण्या त्या क्षुद्र आणे पया !
होतां संचय, जों विचार करितो तें स्वास्थ्य भोगावया
तों ' हे, ऊठ !' म्हणून हात धरुनी मृत्यूच ओढी तया
॥५॥

पृथ्वी सुंदर वस्त्र नेसुनि कशी आम्हांस आनंद दे
' होवो ही वरदा मलाच, ' सकलां ईर्षा अशी वाटते ॥
प्रेमाराधनयोग्य सुंदर अशी सर्वां जरी भासते
हा ! हा ! खेळ करी, परी, फसवुनी मारावयालाच ते ॥६॥

पृथ्वीरूप नटी स्वनृत्य करुनी नाईल ! हो जाग्रत
होईं शांत नि सुज्ञ तूं; नच तिच्या तूं एक शब्दांप्रत ॥
होती ती जर एकनिष्ठचि—तुझ्या लोकांसवें राहती
फेकोनी विषयी कटाक्ष तुज ही केव्हांच ना पाहती ॥७॥

( ५ ) ( वसंततिलका )

वर्तेंच बालक जसा निज खेळण्यांशीं ।
वागे तसा मनुज हा निजजीवनाशीं ॥
आधीं तयां सदुपयुक्त करोनिया, तीं ।
दोघेंहि फोल म्हणुनी दुरि फेकतातीं ॥

(6) Sala

It is an error to suppose that man is master of himself. No man is; He belongs to his wife or his children or his relations or his creditors! It is for their special good, that he lives & works; In short, Society is the master and man is the servant.

(7) Spanish Proverb

He who is not handsome at twenty, nor strong at thirty, nor rich at forty, nor wise at fifty, will never be handsome, strong, rich or wise!

(8) Young

At thirty a man suspects himself a fool;
Knows it at forty and improves his plan;
At fifty, chides his infamous delay
Pushes his prudent purpose to resolve.
In all the magnanimity of thought
Resolves & reresolves and dies the same!

(9) Schopenhauer

The first forty years of life furnish the text.
The remaining thirty, the commentary.

(10) Chamfort

Contact with the world either breaks or
hardens the heart.

( ६ ) ( उपजाति )

‘ धनी स्वताचा नर ’ मानणें हें । प्रमाद ! कोणी स्वधनी न आहे ॥
तो वायकोचा अथवा मुलांचा । वा बांधवांचा, धनको जनांचा ॥
भलें तयांचें करण्या विशेष । जगोनिया तो करितो प्रयास ॥
समाज त्याचा धनि, थोडक्यात । मनुष्य हा किंकर मात्र होत ॥

( ७ ) ( उपजाति )

विशींत ज्या रूप न, ना तिशींत ।
शक्ती, न ज्या वित्तहि चाळिशींत ॥
सुज्ञत्व पन्नाशिंतही न, त्यातें ।
पुढें न जन्मांत कधीं मिळे तें ॥

( ८ ) ( उपजाति )

विशीमधें स्पर्श करी मनाला । “मी मूर्ख” हा संशय मानवाला ॥
खात्री पटे ती परि चाळिशींत । सुधारणेचा सुविचार येत ॥
गेला मधें व्यर्थचि काळ तेणें । पस्तावला हा चिडतो मनानें ॥
विचार जे गुप्त असे मनांत । रूपांतरी तो मग निश्चयांत ॥
उदात्त मोठे अवघे उदार । आजन्म चित्तीं फिरती विचार ॥
पुनःपुन्हां निश्चय हे करून । होता तसा जाइ परी मरून ॥

( ९ ) ( अनुष्टुप् )

चाळीस पहिलीं वर्षे । मूलग्रंथचि जीवनीं ।
उरलीं तीस वर्षे हीं । तट्टीका अर्थबोधिनी ॥

( १० ) ( पृथ्वी )

फुटे हृदय या मनें फाटून हें जगत्संगमें ॥

(11) A. Young

What is this world? *Thy school, O Misery!*

(12) Goethe

Toils of life alone teach us the value of the blessings of life.

(13) Addison

Life is half spent, before we know what it is.

(14) Machiavelli

The world takes you to be what you seem; few know what you are.

(15) Cicero

To live long, it is necessary to live slowly.

(16) Blake

The greatest lesson of life is to learn, not to do what one likes, but to like what one does.

(17) E. H. Young

Do not go into the world to conquer, but go out meaning to learn.

*(18) Bovee*

Discretion is the salt
and fancy the sugar of life;
The one preserves
and the other sweetens it.

(19) Leslie Coulson. But a short time to live!
Our little hour—how swift it flies!
When poppies flare and lilies smile;

(११) (शार्दूलविक्रीडित)

आहे हें जग काय? केवळ तुझी शाळाच, हे दुर्गते ! ॥

(१२) (अनुष्टुम्)

जीवनांतील कष्टांतें उपसूनचि केवळ ।
जीवनांतील सौख्यांचें उमजे मूल्य दुर्मिळ ॥

(१३) (शार्दूलविक्रीडित)

आहे जीवन काय हें समजण्यापूर्वीच अर्धे सरे !

(१४) (पृथ्वी)

जसा दिससि तूं, तसेंच जग हें तुला मानितें
खरा असशि तूं कसा, विरलची कुणी जाणते ॥

(१५) (वसंततिलका)

आयुःपथीं बहुतकाल तगावयातें ।
तेथें अवश्य अतिमंदचि चाल होते ॥

(१६) (भुजंगप्रयात)

"रुचे तें करूं" पाहुनी जीवनांत
"करूं तें रुचो" हाच सर्वोच्च पाठ ॥

(१७) (उपजाति)

जाऊं नको तूं जग जिंकण्यातें । परि तयांतुन शिकावयातें ॥

(१८) (वसंततिलका)

तें तारतम्य लवणासम जीवनांत ।
अन् कल्पना मधुर साखरशी तयांत ।
देई टिकाउपण तें पहिलें तयास ।
आणी दुजी मधुरता नरजीवनास ॥

(१९) जीवनाची अल्पघटि (शार्दूलविक्रीडित)

जी छोटी घटिका अम्हां मिळतसे, धांवे किती शीघ्र ती
खेळाकडे हंसतां, नि चम्पक जशी उत्फुल्ल होती जधीं ॥

How soon the fleeting minute dies
Leaving us but a little while— (1)

To dream our dreams, to sing our song
To pick the fruit—to pluck the flower;
The Gods....they do not give us long—
One little hour ! (2)

Our little hour—how short it is
When Love with deweyed loveliness
Raises her lips for ours to kiss
And dies within our first caress ! (3)

Youth flickers out like wind-blown flame
Sweets of today—tomorrow sour
For Time & Death relentless claim—
Our little hour ' (4)

Our little hour—how short a time !
To wage our wars, to fan our hates !
To take our fill of armoured crime,
To troop our banners—storm the gates. (5)

Blood on our swords,our eyes bloodred
Blind in our puny reign of power
Do we forget how soon is sped
Our little hour ? (6)

Our little hour—how soon it dies !
How short a time to tell our beads;
To chant our feeble Litanies
To think sweet thoughts--to do good deeds;
(7)

कैशी चञ्चल हीं पळें द्रुतगती जातात मृत्यूप्रति
कांहींही करण्या उसंत अपुरी देऊन आम्हांप्रति ॥१॥

स्वप्नें सुंदर सेवण्या, सरससें संगीत वा गावया
वेंचाया सुफळें, सुगंधि अथवा पुष्पेंहि तोडावया—॥
देती देव न दीर्घकाल परि हो लोकीं अम्हांलागुन
भाग्यें लाभति या जगीं विहरण्या आम्हांस कांहीं क्षण ॥२॥

जी अल्पा घटि या कपाळिं लिहिली—ती तोकडी हो किती
सौंदर्यें, दंवबिंदुयुक्त सुमनांऐशी प्रिया ती जधीं,—॥
आम्हां चुम्बन द्यावया, वर करी ओठांस हो ज्या क्षणीं
जाते हाय ! मरून तीच अमुच्या एकाच आलिंगनीं ॥३॥

वातें दीपशिखा हलून विझते, तैसेंच हें यौवन
पक्कावें जरि आज गोड—तरि तें जाणें उद्यां आंसुन ॥
मारी निर्घृण काल, मृत्यु, लुटुनी घेतात दोघेजण
जे आम्हां जगिं लाभतात रमण्या अत्यल्प कांहीं क्षण ॥४॥

आयल्पा घटि आमुची—दिसतसे थोडा किती वेळ हा
देशाशीं पुरुषार्थयास—अमुचीं युद्धें लढाया महा ॥
शास्त्रांनीं अपराध घोर करण्या आतृप्त, लोकांत या
सैन्यांनीं रिपुदुर्ग भेदुनि तिथें झेंडेहि रोवावया ॥५॥

रक्तें रंजित खड्ग; लालचि, खुनी रक्तामुळें लोचन
सत्ता गाजवितों स्व-राज्य फुलवया, जेव्हां मदान्धेक्षण ॥
व्हावी विस्मृति हाय, कीं द्रुतगती जाती घने लोपुन
जेव्हां वैभव पोल हें मिरवितों—ते अल्प सारे क्षण ! ॥६॥

आयल्पा घटि आमुची-मदनिद्रा ही झोप जाई किती !
माळा ओढित ईशनाम जपण्या—हा वेळ थोडा किती ॥
मापांचा प्रभुलागि मंत्र पढुनी—फाकूळली वेडनीं
दोन्हा मोट विचारिं दंग—करण्या सत्कर्म या जीवनीं ॥७॥

The alter lights grow pale & dim
The bell hangs silent in the tower—
So passes with the dying hymn—
Our little hour ! (8)

(20) Carlyle

What is man ?—a foolish baby
Vainly fights and strives & frets
Demanding all—deserving nothing
One small grave—is all that he gets !

(21) Sir J. M. Barrie

To every man, life it just like a diary in which he means to write one story and writes quite another ! His humblest hour is when he compares the volume as it is, with what he intended to make it.

(22) H. W. Longfellow

Ships that pass in the night,
And speak each other in passing !
Only a signal shown and
A distant voice in the darkness ! (1)
So on the ocean of Life
We pass & speak one another !
Only a look & a voice
Then darkness again & silence ! (2)

(23)

Many people hold a mendicant attitude towards life. They travel with an outstretched hand, not to serve but to receive ! They seek

अंतीं दीपक मंद होति, तनुच्या या मंदिराआंतले
होती ते जयघोष मूक अवघे त्या घोर युद्धांतले ॥
मृत्यूंचेंच, निसर्ग गीत म्हणतो त्याच्यासवें बापुडी
जाई मृत्युस हायहाय ! अमुची ही अल्पशी ही घडी ॥८॥

( २० ) ( शार्दूलविक्रीडित )

आहे काय मनुष्य ? मूर्ख शिशु हो ! व्यर्थ प्रयासा करी
राहे जन्मभरी करीत झगडे– जाई चिडोनि परी ॥
नाहीं पात्र कशासही परि सदा सारें वसे मागत
गर्ता मृण्मय चार हात अवघी अंतीं तया लाभत ॥

( २१ ) ( शार्दूलविक्रीडित )

प्रत्येकास सदैव जीवन असे दैनंदिनीच्या परी
योजी एक कथा– नि अन्यचि लिही, हा रीत कांहींतरी ॥
झाला मंग तथा, जशी तुल्तिसे संकल्पितालागुन
आयुष्यांत अतीव नम्रकरसा त्या होतसे तो क्षण ॥

( २२ ) ( शार्दूलविक्रीडित )

जातां रात्रि परस्पराजवळुनी, नौका, समुद्रावरी
धाया एक दुज्यास धीर, वदतां संदेश कांहींतरी ॥
दीपांनीं करुनी खुणाच अवघें वक्तव्य त्या सांगती
बोले शब्द दुरून जे वुणितरी—अंधारिं ते लोपती ॥

तैसे एक दुज्याचिया जवळुनी, या जीवनाब्धीवरीं—
जातां बोलतसूं परस्पर अम्ही थोडेंच कांहींतरी ॥
होती केवळ दर्शनें—पडतसे आवाज कानावरी
मागोनी तम दाटुनी बनतसे निःशब्द सारें परी ॥

( २३ ) ( शार्दूलविक्रीडित )

तृष्णी ठेवित जीवनाप्रति कुणी भिक्षेकऱ्याचे परी
पेल्याला, पसरून हात फिरतो, भेवार्थ ते ना परी ॥

favours and beg from every body without distinction. What can be more degrading to the soul than this ?

(24) Longfellow

O great Eternity!
Our little life is but a gust
That bends the branches of thy tree,
And trails thy blossoms in the dust!

## Chapter 3

### Parts of the body.

(1) St. James

Control thy tongue; it is a little member and boasteth great things; it defileth the whole body; it is an unruly evil full of deadly poison.

(2) Proverb

Eyes believe themselves, the ears other people.

(3) Bechestern

A steady eye & lofty mind are good at all times.

(4) Shakespeare

O! that man's ears should be
*To counsel deaf but not to flattery.*

(5) Proverb

The heart sees further than the head.

(6) Young

If wrong our hearts,
our heads are right in vain!

(7) Saadi

Listen, see, and say nothing
if you wish to live in peace.

(8) Proverb

A great deal of talent is lost to the world for want of a *little* courage.

(9) Colton

Man hath two eyes but one tongue in order that he should see twice as much as he speaks.

(10) Smiles

Watch thy thought when thou art alone.
Watch thy tongue when in company.
Watch thy temper when thou art in family.

(11) La Rochefoucould

The defects of the mind as those of the body grow worse, as we grow old.

(12) Shakespeare

It is the mind that makes the body rich.

(13) French Proverb

Pain, grief, sorrow and misery are the fruits of which passion is the flower on the tree of mind.

(14) Italian Proverb

Keep your mouth shut but your eyes open.

( ६ ) आर्या

हृदयचि जातां विघडुनि घड असुनी बुद्धि होतसे व्यर्थ ॥

( ७ ) शिखरिणी

जगाया शांतीनें जर तुजसि इच्छा निजमनीं ।
पहावें, ऐकावें, परि न वदणें शब्द वदनीं ॥

( ८ ) आर्या

धृति अल्पशी न, म्हणुनी बुद्धि किती जातसे जगीं वाया ॥

( ९ ) अनुष्टुभ्

पहावें जें मनुष्यानें त्याच्या अर्धेंच बोलणें ।
दोन नेत्र, परी जिव्हा एकची याच कारणें ॥

( १० ) अनुष्टुभ्

आवरी स्वविचारांना । एकांतीं असता सदा ॥
जपावें निजजिव्हेला । संगतींतचि सर्वदा ॥
सांभाळी स्व-स्वभावाला । कुटुंबीं वागसी तदा ॥

( ११ ) भुजंगप्रयात

शरीरस्थ जैसे, तसेची मनाचे । यमाच्या सवें वादती दोष साचे ॥

( १२ ) उपजाति

मनामुळें वैभव या तनूस ॥

( १३ ) शार्दूलविक्रीडित

आधीं फूल ' विकार'रूप, ' मन ' या वृक्षावरी येउनी ।
पीडा, खेद, नि दुःख दैन्य असलीं येती फळें मागुनी ॥

( १४ ) शार्दूलविक्रीडित

ठेवा बंद मुखास, मात्र उघडे ठेवा स्वनेत्रांप्रत ॥

(15) Bailey

Love is the art of hearts and
itself is the heart of arts.

(16) John Fletcher

Let our hearts leap to our lips
And in our kisses let them meet.

(17) Boston

Many a lash in the dark, doth conscience give to the wicked.

(18) Proverb

Ultimately hearts are stronger than swords.

(19) Seneca

Eyes will not see, when the heart wishes them to be blind.

(20) Emerson

In studying character, the eyes are a great guide. When the eyes say one thing and the tongue another, the practised man relies on the language of the first.

(21) Lavater

Faces are as legible as books but with two special merits; They are read in much less time and are less likely to deceive us.

(22) Sheikh Saadi ( Tr. Arnold Edwin )

The ear may go through life & never hear
One note of drum or flute or dulcimer

(१५) साकी

हृदयें दाविति कला आपुली प्रेमरूप ती घेई ॥
हृदयस्थानीं सकल कलांच्या प्रेमचि संतत होई ॥

(१६) साकी

उडी मारुनी हृदयें अपुलीं यतोत येउनि ओठीं ।
भिडतां ओठां ओठ घडूं या हृदयांच्याही भेटी ॥

(१७) स्रग्धरा

अंधारीं दुर्जनांना, हृदय कितितरी देइ वेत्रप्रहार ।

(१८) वसंततिलका

खड्गाहुनी हृदय हेंच बलिष्ट अर्ता ॥

(१९) वसंततिलका

"हा अंध" चित्त म्हणतें नयनांस जेव्हां
पाहूंच ना शकति नेत्र कदापि तेव्हां ॥

(२०) उपजाति

चारित्र्य अंतस्थ कळावयातें । स्वनेत्र हें साधन थोर होतें ॥
ते नेत्र जेव्हां वदतात कांहीं । वदे परी जें मुख अन्य कांहीं ॥
सरावल्या, तें, मनुजास नेत्र । विश्वासण्या होति विशेष पात्र ॥

(२१) वसंततिलका

मेघापरी मुखहि होइ सुखाब्द साचें ।
मेघाहुनीहि परि दोन विशेष त्याचे ॥
लागून वेळहि कमी सुखवाघनातें ।
मेघाहुनी घनगर्जक कमी करी तें ॥

(२२) शार्दूलविक्रीडित

सारंगी–सनई–मृदंग–रव वा अन्यान्य मंजुध्वनि ।
राहाती कधि कान आमरणही हे ऐकिस्यावांचुनी ॥

The eye may look the garden's grace and be
Unblessed by rose and vine and rosemery.

The head which hath no pillow of soft stuff
May on a stone find rest and peace enough.
And if no pleasant bedfellow ye own
Thrust hand in bosom and sleep well alone.
But bellies are impatient and rebel
In discontent, unless ye fill them well.

(23) Saadi

You waste the time of your life time,
Thinking with fear and care.
What shall we eat in summer,
In winter what shall be wear?
Aye, Shikam! Ignoble belly!
Content thyself with a cake.
Lest thy better—the manly backbone,
With shameful bending should break!

(24) Raleigh

Hear much and speak little, for the tongue is the instrument of the greatest good and the greatest evil that is done in this world.

(25) Lytton

The field of the mind once cultivated
will not lie fallow for half an hour.

डोळेही कधिं राहती वधितल्यावांचून या जीवनीं ।
उद्यानें, सुमनें, फळें–मधुर हें सौंदर्य रानीं वनीं ॥ १ ॥
ज्या शीर्षा मिळते उशी न मृदुशी केव्हांच या जीवनीं ।
विश्रांतीसह शांति त्या मिळुं शके धोंड्यावरी टेकुनी ॥
शय्यासंगत गोडशी न तुजला लाभेल जेव्हां कुणी ।
राहा झोंपुनि एकटा निज करां वक्षःस्थळीं दाबुनी ॥२॥
पोटें मात्र अधीर ! बंड करिती तृप्तीविना, तोंवर ।
मिष्टान्नें भरुनी कराल न तुम्ही, सतृप्त, त्यां, जोंवर ॥

( २३ ) वसंततिलका

तूं व्यर्थ रे दवडिशी निज जीवनास ।
चिंतांत–याच धरुनी मनिं काळजीस ॥
कीं, "खाद्य काय मिळणार निदाघकाळीं ? ।"
अन् वस्त्र काय उबदार प्रशीतकालीं ? ॥१॥"
हे नीच नीच जठरा ! तव पाप सारें ! ।
खाऊन एक तुकडा परितृप्त हो रे ॥
तें नाही घडेल, तर पौरुषपूर्णवंश ।
लज्जेंत बांधुनि तुटूनाचि जाइ खास ॥२॥

( २४ ) वसंततिलका

द्यावें नरें विपुल ऐकुनि मात्र कानीं ।
बोलूं नये परि विशेष कुणी मुखानीं ।
लोकीं जसें विपुल मंगल, त्या जिभेनें ।
केलें, तसें अति अमंगलही तियेनें ॥

( २५ ) उपजाति

मनःस्वरूपी फलदायि क्षेत्र ।
जोपासके हें जर एकवार ॥
दिल्याविना सत्फल अल्प फोडीं ।
अधीं पदीं भाकड तें न राही ॥

